**कोरोना विषाणूच्या अनुषंगाने उद्भवलेल्या परिस्थितीत आदिवासी कुटुंबांना न्युक्लियस बजेट योजने अंतर्गत गट निहाय आर्थिक मर्यादेची अट शिथिल करणे व वित्तीय अधिकारात वाढ करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन पुरक पत्र क्रमांकः न्युबयो-२०२०/प्र.क्र. ४१/का.-०९**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, विस्तार इमारत, मुंबई-४०० ०३२
तारीख: १० जून, २०२०

**वाचा**

१. शासन निर्णय क्रमांकः न्युबयो-२०११/प्र.क्र.८७/का.७, दिनांक २१.०६.२०१३
२. शासन निर्णय क्रमांकः न्युबयो-२०२०/प्र.क्र. ४१/का.९, दिनांक ०४.०५.२०२०

**प्रस्तावना-**

संदर्भाधिन शासन निर्णयान्वये कोरोना विषाणूमुळे उद्भवलेल्या परिस्थितीमध्ये राज्यात व राज्याबाहेरील विविध ठिकाणी अडकलेल्या आदिवासी कुटुंबांना प्रकल्प स्तरावर मदत करण्यासाठी आर्थिक मर्यादेची अट शिथिल करणे व वित्तीय अधिकारात वाढ करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. या कालावधीत अंत्योदय कार्डधारक , प्राधान्य गटातील कार्डधारक व केशरी कार्डधारकांना अन्नधान्य पुरवठा करण्यात येत आहे. परंतु अजूनही मोठया प्रमाणवर अनुसूचित जमातीच्या कुटुंबियांना शिधा पत्रिका प्राप्त झालेले नाही. त्यामुळे ही कुटुंबे शासनाकडून उपलब्ध करून देणाऱ्या अन्नधान्यापासून वंचित असतात. अनुसूचित जमातीमध्ये विशेषत: आदिम जमाती व पारधी जमाती कुटुंबे आवश्यक कागदपत्र/ प्रमाणपत्र उपलब्ध नसल्याने या सेवा त्यांना मिळत नाहीत असे दिसून येते. सदर बाब विचारात घेवून अशा कुटुंबांना शिधा पत्रिका मिळवून देण्यासाठी कागदपत्र तयार करणे, माहिती /यादया तयार करणे, शिधा पत्रिकेसाठी आवश्यक शुल्क भरणे इत्यादीसाठी न्युक्लियस बजेट योजनेअंतर्गत अर्थसहाय्य करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार कोरोना विषाणूच्या प्रादुर्भावाने उद्भवलेली सद्याची परिस्थिती विचारात घेवून व शिधा पत्रिका नसलेल्या अनुसूचित जमातीच्या कुटुंबांना शिधा पत्रिका उपलब्ध करून देण्यासाठी संदर्भिय शासन निर्णयातील "परि. क्र. ४ (ब) नंतर पुढीलप्रमाणे परिच्छेद क्र. ४ (क) समाविष्ट करण्यात येत आहे."

४ (क) सद्या कोरोना विषाणूच्या उद्भवलेल्या परिस्थितीत आर्थिक संकटात सापडलेल्या अनुसूचित जमातीच्या कुटुंबांना शिधा पत्रिका देण्यासाठी भरावयाचे आवश्यक शुल्क हे संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्याकडून न्युक्लियस बजेट योजनेतून संबंधित यंत्रणेला अदा करण्यात यावे. याअंतर्गत रेशनकार्ड नसलेल्या कुटुंबियांच्या यादया तयार करणे, कागदपत्र तयार करणे इत्यादीसाठी न्युक्लियस बजेट योजनेतून खर्च करता येईल.

सदर शासन पुरक पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक **२०२००६१०१६३५५१५७२४** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant Gopalrao Dhoke

Digitally signed by Laxmikant Gopalrao Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, serialNumber=e714bbcd4d43c6782884c7e7a2091f9f1edc1d97ebb542c48b98fb8c8bdd6cf4, cn=Laxmikant Gopalrao Dhoke
Date: 2020.06.10 17:54:31 +05'30'

**( ल. गो. ढोके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री( आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
५. सर्व संसद सदस्य
६. मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा
८. सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य
९. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर.
११. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर.
१२. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व विभागीय आयुक्त.
१४. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक
१५. अपर आयुक्त, आदिवासी विकास ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
१६. सर्व जिल्हाधिकारी.
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक.
१८. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त् व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक.
१९. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२०. संबंधित प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
२१. सर्व उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद

२३. संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी.

२४. संबंधित तहसिलदार.

२५. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.

२६. संबंधित जिल्हा नियोजन अधिकारी.

२७. सहाय्यक आयुक्त (संबंधित अपर आयुक्त कार्यालय)

२८. निवडनस्ती, कार्यासन-९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.